सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश
निर्मिती मंडळ या पदाच्या अतिरिक्त
कार्यभारास मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## मराठी भाषा विभाग
### शासन आदेश क्रमांकः विश्ववे-२०२०/प्र.क्र.४६/आस्था-२

नवीन प्रशासन भवन, ८ वा मजला,
मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२
दिनांक : १० ऑगस्ट, २०२०

वाचा -

१) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. वेतन १३११/प्र.क्र.१७/सेवा-३, दि.२७.१२.२०११.
२) मराठी भाषा विभाग, शासन आदेश क्र. अतिका-२०१८/प्र.क्र.२४/आस्था-२, दि. २८.०२.२०१८.
३) महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाचे पत्र क्र. विनिमं२०१९/सचिव/अतिरिक्त/कार्यभार/३३५, दि.११.०३.२०२०.

## शासन आदेश

महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळातील “सचिव” या दि. ०१.०३.२०१८ पासून रिक्त झालेल्या पदाचा अतिरिक्त कार्यभार अ.क्र.(२) येथील आदेशान्वये अन्य अधिका-यांकडे सोपविण्यात आला आहे. वेळोवेळी प्रशासकीय विभागाच्या प्राधिकारानुसार तो पुढे सुरु ठेवण्यात आला आहे. दोन वर्षांच्या कालावधीनंतर अतिरिक्त कार्यभार सुरु ठेवण्यास संदर्भ (१) नुसार सामान्य प्रशासन विभाग व वित्त विभाग यांची मान्यता आवश्यक आहे.

संदर्भ (३) मधील महाराष्ट्र मराठी विश्वकोश निर्मिती मंडळाच्या पत्रास अनुसरुन दिनांक ०१.०३.२०२० पासून पुढील एक वर्षासाठी अथवा सदर पद सरळसेवेद्वारे भरले जाईल यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यंत सदर पदाचा अतिरिक्त कार्यभार पुढे सुरु ठेवण्यास या आदेशाद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

ही मंजूरी सामान्य प्रशासन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. २९९/२०२०/का.१२, दि. १४.०५.२०२० व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र. १५४९/१६०४, दि. ३०.०७.२०२० अन्वये प्राप्त सहमतीनुसार देण्यात येत आहे.

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००८१०१५०५१३६९३३ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MANGESH PARSHURAM KUDTARKAR

Digitally signed by MANGESH PARSHURAM KUDTARKAR
DN: CN = MANGESH PARSHURAM KUDTARKAR, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = MARATHI LANGUAGE
Date: 2020.08.17 12:36:30 +05'30'

**(मं. प. कुडतरकर)**
कार्यासन अधिकारी

प्रत,

१) उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
२) उपसचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
५) सचिव, महाराष्ट्र राज्य मराठी विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई ४०० ०२५.
६) सर्व अवर सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
७) सर्व कक्ष अधिकारी, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
८) निवड नस्ती /आस्था -२, मराठी भाषा विभाग.